पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे आधिनस्त पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे अधिपत्याखालील " रबाळे व तुर्भे" पोलीस ठाणे यांचे विभाजन करुन " रबाळे एमआयडीसी व तुर्भे एमआयडीसी "नवीन पोलीस ठाणे निर्माण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र.पीओएस ३११०/६३/प्र.क्र. २३/पोल -३,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ एप्रिल, २०१०

वाचा : १) पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्रमांक -पोमस /२६ अ/४७/नवी मुंबई /रबाळे व तुर्भे पो.ठा. /१३१/०९, दिनांक ०८.०२.२०१० व ०८.०३.२०१०

प्रस्तावना :-

नवी मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या हद्दीतील बेलापूर औद्योगिक क्षेत्राचा विस्तार तेथील उद्योग, वाढती लोकसंख्या, वाढती गुन्हेगारी, वाहनांच्या संख्येत झालेल वाढ यामुळे वाहतुक समस्या तसेच कामगार जगातील घडामोडी, इत्यादी समस्या विचारात घेता कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी व गुन्हेगारीवर नियंत्रण ठेवण्यासाठी सध्याचे " रबाळे व तुर्भे " पोलीस ठाण्यांचे विभाजन करुन " रबाळे एमआयडीसी व तुर्भे एमआयडीसी " नवीन पोलीस ठाणे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

शासन निर्णय :-

वरील प्रस्तावचा सर्वांगिण विचार करुन पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे कार्यक्षेत्रातील " रबाळे व तुर्भे पोलीस " ठाण्यांचे विभाजन करुन पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवरील उपलब्ध मनुष्यबळातुन "रबाळे एमआयडीसी व तुर्भे एमआयडीसी " नवीन पोलीस ठाणे निर्माण करण्यास व यासाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ पोलीस दलासाठी निर्माण करण्यात येणा-या पदांच्या तीव्या पाचव्या टप्प्यामध्ये प्रस्तावित करुन निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००४०३१४३२१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

वानखडे
(प्र.मो.वानखडे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत:

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण परिक्षेत्र कोकण.

पोलीस आयुक्त, नवी मुंबई.
प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा-१), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १ ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
कक्ष अधिकारी, पोल -४ पोल-७, गृह विभाग, मुंबई.
निवड नस्ती (पोल -३)